ई-साहित्य प्रकाशन

अंक क्र. १२ दि. ९ फ़ेब्रुवारी २००९


यजमान संपादक –

**आनंद माने (सोलापूर)**

अतिथी संपादक –

**श्री. निलेश सकपाळ,**

**सौ. मेधा सकपाळ**

सहसंपादक

**सोनाली घाटपांडे ( पुणे )**

**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**

**अहं ब्रह्मास्मि ( पुणे )**

**नाम गुम जायेगा ( ठाणे )**

**सुरुचि नाईक ( नागपूर )**

**सचिन काकडे (मुंबई )**




**जगातल्या नितांत सुंदर मनापासून मनापर्यंत पोहचणा-या**

**'प्रेम' या भावनेला वाहिलेली कवितांची ओंजळ**

## इश्क नही आसाँ...

**“ प्रेम म्हणजे प्रेम म्हणजे प्रेम असतं**
**तुमचं नि आमचं अगदी सेम असतं ”**
**- मंगेश पाडगावकर**

यामुळेच की काय, प्रेमावर लिहीलेल्या कविता प्रेमात पडलेल्या, प्रेमात पडू इच्छिणा-या प्रत्येक मुलाला, मुलीला मोहात पाडतात. प्रत्येकाला ती कविता आपलीच वाटते. प्रेम कुणावर करायचं ? याला काही बंधन नाही , प्रेम मोबदला मागत नाही, प्रेमामध्ये शास्त्राचे सिद्धांत फ़ोल ठरतात, जगाच्या आदिपासून जगाच्या अंतापर्यंत जगातल्या प्रत्येक भाषेत प्रेमाच्या कविता लिहील्या जातील, कविता लिहीण्यासाठी कितीही विषय असले तरी, कुणी प्रेम कवितांना कितीही चिल्लर म्हटले तरीही. मुलामुलींच्या वह्यांच्या मागच्या पानावर, शाळा-कॉलेजातील लाकडी बाकड्यांवर, इमेल्समधून स्क्रॅप्समधून फ़ॉरवर्ड होत राहतील एका पिढीकडून दुस-या पिढीकडे. नेटाक्षरी ला या परंपरेत सामील होण्याचा अभिमान आहे.

आज आपल्याला लाभलेली अतिथी-संपादकांची जोडी ही अशी खासच आहे, मुंबईत वैद्यकीय सेवा करणारी पेशाने आयुर्वेदीक डॉक्टर असणारी कवियत्री **मेधा** , लंडन मध्ये पेट्रोलियम सेफ़्टी मध्ये डॉक्टरेट करणारा कवी **निलेश** असं हे कवितेतून ऋणानुबंध जुळलेलं ऑर्कुट वरील लाडकं दांपत्य.

प्रेमाचा उत्सव दिनदर्शिकेवरील कोणत्याही तारखेचा अथवा तिथीचा मोहताज नाही , उगवणारा प्रत्येक दिवस उत्सवाने जगणा-या प्रेमिकांसाठी हा प्रेम कवितांचा अट्टाहास.

- **आनंद माने (यजमान संपादक)**

## आम्ही दोघं - अतिथी संपादकीय..

नेटाक्षरीच्या तमाम रसिकांना आम्हा उभयंतांचा सादर प्रणाम.आजच्या ह्या खास व्हॅलेंटाईन डे स्पेशल अंकाचे अतिथी संपादक बनण्याचा बहुमान देण्यासाठी संपूर्ण नेटाक्षरी टीमचे हार्दिक धन्यवाद !

सहसा ‘प्रेम’ ह्या विषयावर प्रत्येकाची वेगळी अशी तऱ्हा असते,वेगळी स्वप्नकल्पना असते.किंवा सगळयांच्या आत दडलेल्या रमणीय मनाची ती एक कवीकल्पना असते.

आम्हा दोघांचे सूर जुळले किंवा शब्दं जुळले ते मुळातच या कवितेच्या माध्यमामुळे म्हणजे अर्थातच या मायाजालावरील मायावी ऑर्कुटमुळेच.आणि कदाचित यामुळेच आज आम्ही इथे तुमच्यासमोर आहोत.मुळात दोघांचे असलेले स्वतंत्र स्वभाव,चाकोरीबाहेरची विचारसरणी किंवा दोघांवर अध्यात्माचा अन परमेश्वरी भक्तीचा असलेला प्रभाव आम्हाला ह्या नात्यात सांधण्यास कारणीभूत ठरला.अगदी पहिल्या वहिल्या गप्पांमध्येच भगवदगीतेतील भागावर आमचे विवेचन झाले,अगदी मनसोक्त विचारमंथन झाले.तेव्हाच निलेशला काहीतरी वेगळा संकेत मिळाल्याची जाणीव झाली किंवा जन्मोजन्मीच्या ऋणानुबंधाची पुसटशी साद ऐकू आली.त्यानंतरच्या गप्पांमध्येही सातत्याने देशभक्ती,अध्यात्म,समाजसेवा,साहित्य या जिव्हाळयांच्या विषयांवरील गप्पांमधून एकमेकांना दोघे खऱ्या अर्थाने उलगडत गेलो.आणि विशेष म्हणजे याच काळात इतरांना वा बऱ्याच जणांना गूढ वाटणाऱ्या कवितांची ऑर्कुटवर वर्णी लागली.अन या गूढ कल्पनांच्या गुंत्यातून मेधाने निलेशला अचूक ओळखले.किंवा तिच्या नजरेतून त्याला सुटता आले नाही किंवा तिच्या दृष्टीक्षेपात येण्यासाठीच की काय तेव्हा तो कविता प्रपंच मांडला

कडकडून जिंदगी आली भेटण्या तुला
दे तिला गळा मिठी उमटू दे नव्या खुणा

नव्या जगात जिंदगी रुपही तिचे नवे
नव्या नव्या क्षणांतल्या उमटू दे नव्या खुणा

पसर पंख मेधवी झेप घे निळाईची
निळ्या निळ्या नव्या नभी उमटू दे नव्या खुणा

अशाच राहू दे नभी सूर्य चंद्र तारका
तिमीर पाठीशी तुझ्या उमटू दे नव्या खुणा

कडकडून जिंदगी आली भेटण्या तुला
दे तिला गळा मिठी उमटू दे नव्या खुणा

**- नाम गुम जायेगा**



गेला.सुरुवातीला मेधाला कवितेतील वेगळेपणाची अनुभूती आली अन तिने मग एक आव्हान म्हणून इतर कवितांचा माग घेतला.
याच काळामध्ये, ऑर्कुटवर मराठी काव्यात क्रांती घडविण्याच्या उद्देशाने बेनाम राहून झटणाऱ्या 'नाम गुम जायेगा' ह्या प्रोफाईलच्या नजरेतून हा प्रकार सुटणे केवळ अशक्य होते।त्यांनी वेळीच निलेशकडून ह्याची खातरजमा केलीच पण त्याचवेळी मेधाला या नवनात्याच्या सुरुवातीसाठी प्रोत्साहित केले 'आशिर्वाद' ह्या कवितेतून.

पुढेही वेळोवेळी त्यांनी व त्यांच्या धर्मपत्नीने हा आधार व अनेक शुभाशिर्वाद आम्हा दोघांना दिले.थोड्याच दिवसानंतर आमच्या ह्या ऑर्कुट प्रवासात आमची ओळख चेन्नईच्या 'जादूई 'प्रभा मावशीशी झाली,तिच्या जादूई शुभेच्छा अन आर्शिवादांची लाभलेली साथ अवर्णनीय अन कल्पनातीत आहे.नेटाक्षरीच्या पहिल्या वहिल्या अंकाचे अतिथी संपादक पदही तिने भूषवले आहे.
आमच्या ओळखीची परिणीती नात्यात झाली ती केवळ एका महिन्याच्या कालावधीत.त्यामध्ये अनेकदा आम्ही ऑनलाइन भेटलोही नाही व दूरध्वनीवरुन संवाद साधला तोही केवळ दोन वेळाच.त्यातही दुसऱ्यावेळच्या संभाषणामध्ये एका गूढ पध्दतीने मेधाला मागणी घातली.(योगायोगाने ह्या गोड प्रसंगास ह्याच आठवड्यात २ वर्षे पूर्ण होत आहेत.)अर्थातच,तिला त्याचा उलगडा फोन ठेवल्यानंतर काही वेळाने झाला.बस्स मग त्यानंतर आणखी एक इंटरनेटवरील ऑनलाइन भेट आम्हा दोघांना या नात्यात घट्ट बांधून गेली.त्यानंतर आम्ही जवळजवळ साडेतीन महिन्यांनी प्रत्यक्ष भेटलो.पण खरे सांगायचे तर प्रत्यक्ष भेट ही केवळ औपचारिकताच होऊन राहिली होती.एवढी या गूढ नात्याची गूढ मोहिनी आम्हावर होती आणि ती त्यानंतर म्हणजेच २ वर्षांनंतर आजतागायत,लग्नानंतर तशीच तेवढी किंवा त्याहीपेक्षा आणखी जास्त आम्हा दोघांना व्यापून आहे.

**- श्री निलेश व सौ मेधा सकपाळ**



**अतिथी संपादकांविषयी**

असा मी..

कविता करण्यापेक्षाही भावनांना शब्दांत गुंफता येतं,हे माहित होतं.पण,त्या इतरांसमोर सादर का करायच्या,ती तर आपली एकांतातील स्पंदनं असतात अन ती आपली असतात.अशाच काहीशा गोंधळामुळे माझ्या कविता किंवा माझं लिखाण इतरांपासून अलिप्त होतं.पण मग कोणे एकेकाळी ऑर्कुट वेबसाईट पाहिली.आणि मग सहज प्रोफाईलच्या आडून अनोळखी लोकांनी माझ्या कविता वाचून बघाव्यात असं वाटलं.जेणेकरुन त्यांच्या प्रांजळ प्रतिक्रिया मिळत राहतील.रसिकांच्या प्रतिक्रियांमुळे सुरु झालेला हा सिलसिला ऑर्कुटवर भेटलेल्या नाम काकांच्या प्रोत्साहनामुळे आजपर्यंत टिकून आहे.तसेच सहचारिणी मेधाबरोबर नेहमी होणाऱ्या गप्पांमुळे मिळणारी प्रेरणा शब्दांतीत आहे.बऱ्याच जणांना माझी कविता लेखन शैली गूढ वाटते पण ह्याच गूढपणामुळे मला माझी जीवनसाथी मिळाली हेही तितकंच खरं !

या कविता लिखाणाबरोबरच ‘तरुण भारत’ सारख्या वर्तमानपत्रामध्ये लेखही लिहीण्याची संधी मला प्राप्त झाली तीही ऑर्कुटवर प्रसिध्द झालेल्या कवितांमुळेच.

**- निलेश सकपाळ**

अशी मी..

लहानपणापासून असलेली साहित्याची गोडी,पुस्तकांचा असलेला व्यासंग अन नवनवीन साहित्य वाचण्याची आवड मला ऑर्कुटवरील काव्यविश्वात घेऊन आली.सुरुवातीला कविता वाचून स्वतःला आवडेल किंवा कविता वाचल्या वाचल्या जे स्फुरेल ते अभिप्राय म्हणून मी लिहायला सुरुवात केली.माझे अभिप्राय वाचून कोणि माझ्याशी संपर्क साधेल असं वाटलं नव्हतं अन नेमकं तेच झालं.एकीकडे नाम काकांशी ओळख झाली अन त्यांच्याशी कविता व इतर साहित्यावर नित्यस्वरुपाची चर्चा घडत गेली.तर दूसरीकडे ह्या अभिप्रायांमुळेच निलेश माझ्या आयुष्यात आला.नाम काकांनी दिलेल्या आव्हानामुळे माझी पहिली कविता नावारुपास आली अन नंतर ती तशीच या नाम काकांच्या व माझ्या नवऱ्याच्या प्रोत्साहनामुळे बहरत गेली,ती अगदी आजतागायत !

**- मेधा सकपाळ**

# “ पहिलं प्रेम ”

ती म्हणाली,
“ मी पहिल्यांदा कुणाचा हात असा हातात
घेतेय,
पहिल्यांदाच कुणाची इतकी ओढ वाटतेय !
हा पहिला स्पर्श मी आयुष्यभर जपून ठेवेन”

मी नाही म्हणू शकलो तसंच
कारण...
माझ्या जवळ जवळ सगळयाच पहिल्या वेळा
आधिच झालेल्या

खरं तर पहिला शब्द सोडला तर
माझ्याही मनात भावना तशाच,
तितक्याच उत्कट
पण तिच्या अपेक्षांसमोर अपू-या,
अधु-याच ‘पहिल्या’ शब्दाविना...



तिनं माझ्या डोळयात बघितलं
आणि तिला जे कळायचं ते कळलं
नकळत हातात घेतलेला हात
तिने अगदी हळूवार पणे सोडवून घेतला
मग..
मी नाहीच थांबवू शकलो
तिच्या पापण्यात डोकावणारी आसवं
‘मला उशीर होतोय मी निघते म्हणत’
तिची निरोप घेणारी पावलं

आणि तितक्यात...
पाऊस आला
अगदी मुसळधार
मी नेहमी सारखाच होतो छत्रीशिवाय
आज तीही छत्री विसरलेली
तसं भिजणं, आम्हां दोघांच्या आवडीचं

पुढच्या काही क्षणातच आम्ही दोघेही चिंब झालो
ती थांबली, वळली ...
मी जवळ गेलो
आणि ती पटकन मिठीत शिरली...
मी, “पहिला पाऊस कधीच पडून गेला गं !”
ती “ हो, पण आताचा पाऊसही तितकाच खरा आहे !”

**- जगदिश**

## मिस्ड कॉल

रिमझिमणारा पाऊस अन दाटून आलेलं आभाळ
अंधारलेली कूंद हवा थबकलेला काळ

वेळ तशी दूपारचीच, तरीही कातर कातर
आणि त्यात टपरीवरच्या रेडीओतील जगजीतची भर..

“होशवालोंको खबर...” ऐकून बेहोष झालेला मी
काय हवं अजून? फ़क्त तुझीच कमी...

मी केलय बंक कॉलेज..., तुला मात्र लेक्चर
तुला नाही बोलावत का ? ही वेडावणारी सर

मी बाहेर चिंब... अन तुही बहुदा आत...
मी गातोय मोठ्यानी... अन तुही आतल्या आत

मी उभा, हातात भिजल्या कवितांची वही
मोबाईलच्या निळया प्रकाशातली तुझी उजळलेली छबी..

थांबून जावं सगळं एकदम, गोठून जावं जग
फ़क्त तू वळून एकदा खिडकी बाहेर बघ

कोरून घ्यायचाय क्षण सखे हा ह्रदयामध्ये मला
मुद्दामूनच तुला आत्ता मिस्ड कॉल दिला !!

**- मुरारी**

## “ अमर आलिंगन”

रविवार सकाळची वेळ होती
मी हॉलमध्ये पेपर वाचत बसलो होतो,
ती नुकतीच सुस्नात होऊन बाहेर आली,
“चहा घेणार का तुम्ही ?” असं मला म्हणाली,
मी तिच्याकडे न बघताच हो म्हणालो,
आणि पुन्हा पेपर वाचण्यात गढून गेलो,
माझ्या जवळून जाताना तिने केसांना नाजूक झटका दिला,
त्यातून उडालेल्या तुषारांनी पेपर मात्र ओला झाला,
मी उगाच खट्याळ नजरेने तिच्याकडे पाहिले,
तिनंही मग खोट्या रागाने तोंड आपले फिरवले,
मी हळूच उठलो खुर्चीवरून आणि स्वयंपाक घरात आलो,
तिनं माझ्याकडे बघावं म्हणून फ्रिजवर तबला वाजवू लागलो,
तिनं मात्र मागं न बघताच चहाचं आंधण ठेवलं,
आणि मग मला चिडवायला आपलं नाक उडवलं,
तिच्या पाठमो-या रूपाकडे बघत मी क्षणभर तसाच थांबलो,
उगाच तिला दुखवले म्हणून स्वतःशीच मनाशी भांडलो,
हळूच मग मागे जाऊन मी तिच्या कमरेला विळखा घातला,
पण गडबडीत चहाच्या भांड्याला लागून हात माझा भाजला,
मी कळवळून हात झटकताना ती मात्र मनसोक्त हसली,
चावटपणाची वेडी लहर माझ्या मनात उठली ,
मी जखडले तिला मिठीत, ती म्हणाली “जाऊ द्या ना!”
मी म्हणालो तिला “तुला माझ्यात सामावू दे ना”
ती लाजून म्हणाली “ अहो असं काय करताय, चहा उकळतोय”
मी म्हणालो “उकळू दे इथं माझा जीव जळतोय”
“ अहो असं काय करता, दूध उतू जाईल ना”
“कशाला काळजी करतेस मी परत आणून देईन ना”



ती ऊगाच कारणं देत होती, मी प्रत्येक कारण उडवत होतो,
तिला अजूनच जवळ घेत, माझ्या मनासारखं घडवत होतो,
शेवटी तिनं कारण दिलं " अहो सिलेंडरचा बहूतेक वास येतोय"
मी म्हणालो "हो का! मला वाटले की माझा चावटपणा अती होतोय"
तेवढ्यात दाराची कडी वाजली,
मी मनातल्या मनात बाहेरच्याला इरसाल शिवी घातली,
तिनं झटकन स्वतःला माझ्या तावडीतून सोडवून घेतलं
आणि हळूच मला धक्का मारून, स्वयंपाकघराबाहेर लोटलं,
मी वैतागानं दार उघडलं समोर कचरावाला दिसला,
माझा खांद्याशी ओला झालेला शर्ट पाहून तो पण गालात हसला,
मी कचरा देऊन झटकन दार लावून घेतलं
पण मागे वळताक्षणी काहीतरी विचीत्र घडणार आहे, असं मला वाटलं
पहिले मला स्वयंपाकघरातून, दूध जळण्याचा वास आला,
नंतर कान दणाणून सोडणारा, सिलेंडरचा स्फ़ोट झाला,
मी धावत आत गेलो, माझं ह्रदय धडधडत होतं,
माझ्या डोळयादेखत तिचं पातळ आगीवर फ़डफ़डत होतं,
मी तिला उचलून घेतलं, डोळे माझे झरत होते,
तिच्या करपलेल्या कायेवरून हात माझे फ़िरत होते,
मोठ्या कष्टानं तिने डोळे उघडले,
मला पाहून ओठांवर, हास्य मग विलसले,
ती म्हणाली मला, "एकदा मला तुमच्या मिठीत घ्या ना"
" मरण्यापूर्वी मला, तुमच्यामध्ये सामावू द्या ना!"
मी कवटाळले तिला उराशी , अन देवाचे स्मरण करू लागलो,
दूध उतू गेलं होतं पण ऒटा मात्र फ़ेसाळला होता
आम्हा दोघांचं अमर आलिंगन पाहून
तिचा मृत्यूही क्षणभर रेंगाळला होता.

**- नीरज कुलकर्णी**



## “बकुळीचा गंध”

रोज प्रभाती बकुळीखाली, आपण दोघे भेटत होतो
वेचत असता रास फुलांची, स्पर्श अनोखा जाणत होतो

गंध तयांचा घेता घेता, मुक्तपणाने बोलत होतो
चोरून बघता नेत्रामधले, बिंब आपुले शोधत होतो

अजुन मजला आठवतो गं अंगणातला बकुळसडा
तिथेच आपण वाचत होतो, प्रेमाचा पहिलाच धडा

अजुन मजला आठवते गं ओळख आपुली ती पहिली
गंधी फुलांच्या मोहुनी जाता प्रीत आपुली बहरून आली

वेल प्रीतीची बहरून येता, कुंदकळ्या बघ हसु लागल्या
गंध तयांचा पिऊन सारा, उषा निशा अन दिशा धुंदल्या

स्वप्नातील संसारातच रंगून जाता एकमेका हरवून बसलो
प्रेमामृत हे प्राशन करता वसुधेला या विसरून गेलो

दृष्ट लागली प्रेमा आपुल्या कोणा अधमाची
म्हणून आपण वाट चालतो अलग प्रपंचाची

अखंड वाहे सुगंध जगती , सुकलेल्या या बकुळ फुलांचा
अमर राहते प्रीत जगी या, इतिहास सांगतो प्रेमाचा

- **वा. रा. गोडबोले**



# " गुंजारव "

हे सुंदरसे गीत प्रेमाचे, बहरते हळूच मनात,
सूर स्वर्गीचे ताल प्रीतीचे, लय एकच दोघात - -1

येती अवचित शब्द लाजरे, स्फुरते गीत स्वरात,
कुणी छेडले नाद-तराणे, घुमती स्वर जगतात - -2

उत्फुल्लितसे रोम देहाचे, खुलते रात बनात,
गीत नवे अन भाव पुराणे, गुंजारव कानात - -3

कुणा कळावे भाव मनीचे, भासते स्वप्न सत्यात,
उरी जपावे क्षण सौख्याचे, रेशमी तव पाशात - -4

– मेधा नाखरे



## तू दिलेली शपथ

तुझ्या त्या असाध्य आजारात
मी पण मरत होतो तुझ्या बरोबरच
कणा कणाने ... क्षणा क्षणाने
तेंव्हाच ठरवलं होतं..
ताजमहाल बांधून दिखावा करण्यापेक्षा
सरळ तुझ्या मागेच चालत जावं
पलीकडच्या आकाशात

पण अगदी शेवटच्या क्षणी
तू दिलेली शपथ 'माझ्यासाठी जग'
आणि निघून गेलीस... एकटीच ..

तसा मी अजून जीवंत आहे गं
पण काय होतं माहीतेय
तुझ्या शिवाय इथे जगता येत नाही
अन तुझ्या शपथे साठी मरताही येत नाही

**- हरवलेले आकाश**

## माझं प्रेम आहे

अंगणातल्या झाडावर
झाडांच्या फुलांवर
फुलांच्या गंधावर
पाण्याच्या थेंबावर

काळयाकुट्ट ढगांवर
पावसाच्या पाण्यावर
पाण्याच्या थेंबावर
माझं प्रेम आहे

मळक्या पायवाटेवर
समुद्राच्या लाटेवर
शेतातल्या मोटेवर
माझं प्रेम आहे
माणसातल्या देवावर
देवातल्या माणसावर
सा-या देवमाणसावर
माझं प्रेम आहे

जगातल्या सा-यांवर
सा-यांच्या जगावर
माझं प्रेम आहे
कारण ..
माझं माझ्या आयुष्यावर प्रेम
आहे

**- अनिल बिहाणी**

## मिलन

निळे आभाळ दिठीत । तुझ्या चंदनी मिठीत ।।
उरे धडधडे गीत । ओठे उष्टावली ।।

तृप्त आगर सुखाचे । नख त्याला न दुखाचे ।।
मन सधन पंखाचे । जन्मे ओलांडली ।।

न्हातो पाऊस सरींचा । गार वारा लहरींचा ।।
देह वितळे मेणाचा । हरवले स्वत्व ।।

तुटे जग माया बंध । नाही सभोवाचा गंध ।।
लख्ख आनंद आनंद । उजविला भगवंत ।।

कैसे तन्मये हे ध्यान । आत्मे आत्मा एकलिन ।।
दृढ योगया जे कठिण । आम्ही साधियेले ।।

**- भूराम**

## मधुगंध आठवांचा

मधुगंध आठवांचा उमडून ये अताशा
हृदयात वेदना या हरखूनही जराशा

सारी तुझ्या स्मृतींची जादू जूनीच आहे
काट्यावरी उमलती नाजूक या कळयाशा

स्वप्नात पाहिलेले ते ताटवे फुलांचे
हातात पाकळया या त्याही मला पुरेशा

उद्रेक भावनांचा आता अनर्थ आहे
मग पापण्या कशा या भिजल्या जराजराशा

हृदयातल्या व्यथेने हृदयामधुन गावे
जाणुन वागलो मी रूसली आता निराशा

प्रेमात ना कधीही मी शोधिले सुखाला
सुखनैव साहतो की या धारा हव्याहव्याशा

**- अतुल मयेकर**

# “प्रेम कुंभाराचा घडा”

प्रेम कुंभाराचा घडा
आधी भट्टीत भाजतो
मग पिचून सजतो

प्रेम गुलाबाचे झाड
काटे तळाला बोचती
फ़ुले शेंड्याला सजती

प्रेम चुल्यावरील तवा
आधी सोसावे चटके
मग मारावे मिटके

प्रेम लोहाच्या अवजारापरी
खावे हातोड्याचे धक्के
तेंव्हा होते हत्यार पक्के

प्रेम मृगाच्या सरीपरी
सोसाट्याने गर्जत येते
कधी वादळ बनवून जाते

प्रेम खळखळणारी नदी
खळखळत सागरात जाते
अन त्यातच विलीन होते

प्रेम बदलत्या ऋतुवानी
कधी उन कधी पाणी
कधी बोच-या थंडीवानी

प्रेम तळाहाताच्या फ़ोडापरी
जपा त्यासी जीवापाड
नका करू नजरेआड

प्रेम अळूपर्णातील थेंब
सावरावा सदा तोल
प्रेम असे बहुमोल

- सुरेश शिरोडकर

मिसळपाव अक्षरी

## ‘पंधरावं रत्न’

अनामिक हुरहुर म्हणजे का प्रेम ?
की प्रेम म्हणजे अंतरातील काहूर
प्रेम म्हणजे हळवे शब्द हळवी कसम
की ह्रदयाच्या कोमल पाकळीवरची भळभळणारी जखम
कळत नाही प्रेम म्हणजे नक्की काय असतं

डोळ्याच्या अथांग अवकाशातील प्रतिबिंब ?
की भावनांच्या शांत सरोवरातील तरंग ?
प्रेम म्हणाय़े हवाहवासा स्पर्श
की जीवघेणा संघर्ष ?
कळत नाही प्रेम म्हणजे नक्की काय असतं

मी मी म्हणणा-यालाही वेड लावतं
सृष्टीचा आधार म्हणून कधी हवंसं वाटतं
तर जीवनच अमृत म्हणून कधी प्यावसं वाटतं

शब्दांच्या सीमा ओलांडून क्षितीजापार धावणारं
खरं सांगू प्रेम म्हणजे नक्की काय असतं
समुद्रमंथनातून निघालेलं
देवदानवांच्या भांडणात
मानवाच्या पदरात पडलेलं
प्रेम म्हणजे पंधरावं रत्न !

- **संगीता अर्बुणे**



## माझ्या (जाड्या) प्रियेस...

म्हणू देत तुला ते जाडी, चिडवोत हसो वा कोणी
पण प्रेम तुझ्यावर जडले, लाडके प्रिये हे राणी

गोबरे तुझे ते गाल
ताकावर जणू ये लोणी
निष्पाप चेहरा ऐसा
टवटवीत कुसुमावाणी

त्या निरागसतेला भूललो, सुरू झाली प्रेमकहाणी
मग प्रेम तुझ्यावर जडले, लाडके प्रिये हे राणी

थरथरत्या शिशिरनिशेला
ना शाल दिलासा देई
कुडकुडत्या थंडीमध्ये
कांबळे पुरे ना होई

तव देहाची मम तनुला उब देई दुलई सजणी
बघ प्रेम तुझ्यावर जडले लाडके प्रिये हे राणी

तारूण्य तुझे फुललेले
मम मिठीत मावत नाही
देऊनही तुजला सारे
वाटते राहिले काही

सामावून मजला घेशी, मग विशाल अंतःकरणी
बस प्रेम तुझ्यावर जडले लाडके प्रिये हे राणी !

**- आनंद बेंडे**






*नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो*
*आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .*

netaksharee@gmail.com